**सन २००९-२०१० या वित्तीय वर्षातील मुद्रांक शुल्क अनुदानाचा माहे डिसेंबर २००९ ते मार्च २०१० या चार महिन्याकरीता चौथा (अंतिम) हप्ता.**

३६०४ स्थानिक संस्था व पंचायत राज संस्था यांना नुकसान भरपाईच्या व अभिहस्तांकित रकमा देणे-भारीत-मागणी क्रमांक एल-५- २००- भारित (०१)(०१) महाराष्ट्र जिल्हा परिषदा व पंचायत समिती अधिनियम १९६१ च्या कलम १५८ अन्वये जिल्हा परिषदांना **मुद्रांक शुल्क अनुदाने. (३६०४०३०७)**

**महाराष्ट्र शासन**
ग्राम विकास व जलसंधारण विभाग
शासन निर्णय क्रमांक-. बीजीटी २००९/प्र.क्र. ५०२५ / वित्त-३, (२४).
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२, दिनांक - **११ मार्च, २०१०.**

**वाचा :** १) महसूल विभागाचे शासन निर्णय , क्रमांक- मुद्रांक २००२/२४/प्र.क्र.३३४/म-१, दिनांक २२ सप्टेंबर, २००३.

२) शासन निर्णय ग्रा.वि.व ज.सं.वि. क्रमांक-बीजीटी-२००९/प्र.क्र.५०२५/ वित्त-३,(२४). दिनांक - १८ मे, २००९.

३) शासन निर्णय ग्रा.वि.व ज.सं.वि. क्रमांक-बीजीटी-२००९/प्र.क्र.५०२५/ वित्त-३,(२४). दिनांक - **७ जुलै, २००९.**

४) शासन निर्णय ग्रा.वि.व ज.सं.वि. क्रमांक-बीजीटी-२००९/प्र.क्र.५०२५/ वित्त-३,(२४). दिनांक - **१८ नोव्हेबर, २००९.**

## शासन निर्णय

महाराष्ट्र जिल्हा परिषदा व पंचायत समित्या अधिनियम १९६१ मधील कलम १५८ अन्वये जिल्हा परिषदांना एक टक्का मुद्रांक शुल्क अनुदान देय आहे. हे अनुदान देता यावे म्हणून सन २००९-२०१० या वित्तीय वर्षाकरीता रुपये १५०,००,००,०००/- ( रुपयें एकशे पन्नास कोटी, फक्त ) एवढी अंदाजपत्रकीय तरतुद मंजूर केली आहे. सदर तरतुदीपैकी माहे एप्रिल, २००९ व मे, २००९ आणि माहे जुन, २००९ व जुलै, २००९ या महिन्याकरीता देण्यात आलेल्या पहिल्या व दुस-या हप्त्याकरीता अनुक्रमे रुपये २५,००,००,०००/- आणि रुपये २४,९९,९५,०००/- प्रमाणे एकूण रुपये ४९,९९,९५,०००/- ( रुपये एकोणपन्नास कोटी, नव्याण्णव लक्ष, पंच्याण्णव हजार फक्त ) एवढया रक्कमा संदर्भाधीन क्रमांक २ व ३ च्या शासन निर्णयान्वये सर्व जिल्हा परिषदांना

वितरीत करण्यासाठी नोंदणी महानिरीक्षक व मुद्रांक नियंत्रक महाराष्ट्र राज्य पुणे यांच्याकडे सुपूर्द करण्यात आल्या आहेत. त्याचप्रमाणे संदर्भाधीन दिनांक १८ /११/२००९ च्या शासन निर्णयान्वये ऑगस्ट०९ते नोव्हेंबर ०९ या चार महिन्यांकरीता रु.५०,००,०५,०००/- इतकी अनुदानाची रक्कम सर्व सबंधीत जिल्हा परिषदांना वितरीत करण्यासाठी नोंदणी महानिरीक्षक व मुद्रांक नियंत्रक, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचेकडे सुपूर्द करण्यांत आली आहे. अशा प्रकारे माहे नोव्हेंबर, २००९ अखेरपर्यंत उपरोक्त मंजूर तरतूदीपैकी एकूण रुपये १००,००,००,०००/- इतकी अनुदानाची रक्कम नोंदणी महानिरीक्षक व मुद्रांक नियंत्रक, महाराष्ट्र राज्य, पुणे यांच्याकडे सूपुर्द करण्यात आली आहे.

२. आता या शासन निर्णयान्वये माहे डिसेंबर २००९ ते मार्च २०१० या चार महिन्यांकरीता रुपये ५०,००,००,०००/-( पन्नास कोटी फक्त ) एवढी रक्कम नोंदणी महानिरीक्षक व मुद्रांक नियंत्रक, महाराष्ट्र राज्य, पुणे, यांच्याकडे सुपुर्द करण्यात येत आहे. अशा प्रकारे सन २००९-२०१० करीता आतापर्यंत एकूण रु.१५० कोटी इतकी मुद्रांक शुल्क अनुदानाची रक्कम सर्व जिल्हा परिषदांना वितरीत करण्यासाठी नोंदणी महानिरीक्षक व मुद्रांक नियंत्रक, महाराष्ट्र राज्य पुणे यांच्याकडे सुपूर्द करण्यांत आली आहे. सदर रक्कम जिल्हा परिषदांना त्यांच्या वसूलीच्या प्रमाणात त्वरीत वितरीत करावी व वितरीत केलेल्या वितरण आदेशाच्या प्रती या विभागाकडे पाठवाव्यात. या शासन निर्णयान्वये मंजूर केलेल्या रकमेपेक्षा जास्त रकमा वितरीत होणार नाहीत, याची दक्षता नोंदणी महानिरीक्षक व मुद्रांक नियंत्रक महाराष्ट्र राज्य ,पुणे यांनी घ्यावी.

३. ग्राम पंचायतीच्या क्षेत्राधिकारात झालेल्या स्थावर मालमत्तेच्या व्यवहारासंबंधात त्यांना अनुज्ञेय असलेल्या मुद्रांक शुल्क अनुदानाच्या ५०% रक्कम संबंधित जिल्हा परिषदांनी संबंधित ग्राम पंचायतीच्या ग्रामनिधीत जमा करण्याबाबत वर परिच्छेद १ मध्ये नमूद केलेल्या अधिनियमातील कलम १५८(४) अन्वये असलेली तरतूद, तसेच महाराष्ट्र जिल्हा परिषदा व पंचायत समित्या ( स्थावर मालमत्तेच्या हस्तांतरणावरील मुद्रांक शुल्क)अधिनियम, १९६१ मधील नियम १० मधील तरतूद विचारात घेऊन, नोंदणी महानिरीक्षक व मुद्रांक नियंत्रक, महाराष्ट्र राज्य,पुणे यांनी या अनुदानाच्या मंजूरी आदेशात आवश्यक त्या अटी व शर्ती यांचा अंतर्भाव करावा.

४. जिल्हा परिषदांना हे अनुदान प्राप्त झाल्यानंतर अनुदान प्राप्त झाल्याचा दिनांक व मिळालेली रक्कम याबाबतची माहिती या विभागाकडे आणि नोंदणी महानिरीक्षक व मुद्रांक नियंत्रक, महाराष्ट्र राज्य, पुणे यांच्याकडे अनुदानाचे ताळमेळ घालण्यासाठी पाठवावी.

५. नोंदणी महानिरीक्षक व मुद्रांक नियंत्रक, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी जिल्हा परिषदांना मंजूर केलेल्या व संबंधित शिर्षाखाली खर्ची पडलेल्या रक्कमेबाबतची माहिती शासन परिपत्रक

ग्राम विकास विभाग क्रमांक आरसीएन १०८९/प्र.क्र.३०२७/२८, दिनांक ५ सप्टेंबर, १९९० ला जोडलेल्या विहीत प्रपत्रात भरुन या कार्यासनाकडे पाठवावी.

६. या बाबीवर होणारा खर्च मागणी क्रमांक एल-५" ३६०४ स्थानिक संस्था व पंचायत राज संस्था यांना नुकसान भरपाईच्या व अभिहस्तांकित रकमा देणे, २०० इतर संकिर्ण भारीत (एक) महाराष्ट्र जिल्हा परिषदा व पंचायत समित्या अधिनियम,१९६१ च्या कलम १५८ अन्वये जिल्हा परिषदांना मुद्रांक शुल्क अनुदाने (३६०४०३०७)" या लेखाशिर्षाखाली दाखवावा व सन २००९-२०१० या वित्तीय वर्षासाठी अधिनस्त ठेवलेल्या तरतुदीतून खर्ची टाकावा. हा शासन निर्णय, प्राप्त झाल्याची पोच हया विभागास पाठविण्यात यावी.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करण्यांत आला असून, त्यांचा संगणक संकेतांक २०१००३१११७१७४०००१ असा आहे.

८. हा शासन निर्णय वित्त विभागाचे परिपत्रक क्रमांक-अंदाज-१०.०९/सीआर--/२००९ /अर्थसंकल्प-३, दिनांक २३ मार्च,२००९ अन्वये त्यांच्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

( सुरेखा र. सूर्यवंशी )
अवर सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रति,

१) नोंदणी,महानिरीक्षक व मुद्रांक नियंत्रक, महाराष्ट्र राज्य,पुणे,
२) महालेखापाल-१ महाराष्ट्र राज्य,मुंबई ,( लेखा व परिक्षण)
३) महालेखापाल-२ महाराष्ट्र राज्य,नागपूर, (लेखा व परिक्षण)
४) महालेखापाल-१ महाराष्ट्र राज्य,मुंबई ,(लेखा व अनुज्ञेयता)
५) महालेखापाल-२ महाराष्ट्र राज्य,नागपूर, (लेखा व अनुज्ञेयता)
६) सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
७) सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य लेखा व वित्त अधिकारी सर्व विभागीय आयुक्त,
८) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
९) उपसंचालक लेखा व कोषागारे, कोकण भवन नवी मुंबई बेलापूर/नाशिक/पुणे/ औरंगाबाद/अमरावती/नागपूर,
१०) महसूल व वन विभाग,मंत्रालय,मुंबई,
११) वित्त विभाग ( व्यय १५) (बीयुडी-१६) व अर्थोपाय कार्यासन, मंत्रालय,मुंबई,
१२) मुख्य लेखा परिक्षक,स्थानिक निधी लेखा,नवी मुंबई, बेलापूर ,
१३) उप मुख्य लेखा परिक्षक स्थानिक निधी लेखा, कोकण भवन/बेलापूर नाशिक/ पुणे/ औरंगाबाद /अमरावती/नागपूर.
१४) कार्यासन क्रमांक-वित्त-१, वित्त-७ व वित्त-८, ग्राम विकास व जलसंधारण विभाग.